# शीघ्रकाव्य

भाग १

(मराठी)


## हनुबाब






eBook Publication Pvt. Ltd. ®

प्रथमावृत्ती - एप्रिल २०१९

# शीघ्रकाव्य भाग १ (मराठी)

**‘हनुबाब’ उर्फ श्री. हनुमंत ह. रेडकर**
(havhanubab@gmail.com)

प्रकाशक:

eBook Publication Pvt. Ltd. ®
4/47, उदय को. हौ. सोसायटी,
आरे रोड, गोरेगाव पश्चिम,
मुंबई, महाराष्ट्र, भारत, ४०००६२
Telephone: +91 7038164022
Email: publicationebook@gmail.com

प्रथमावृत्ती: **२४ एप्रिल २०१९**



मुखपृष्ठ:

Santosh S. Dabholkar, Graphic Designer
M: +91 8652723560, Email: santoshdesigner@gmail.com

Ram D. Dhas, Razzel Design, Graphic & Website Designer
M: +91-9773699050, www.razzeldesign.com

# eBook Terms & Conditions

## 1. This eBook* may be

a. Distributed without modification or sale.

b. Copied for personal and educational use.

c. Printed for personal and educational use.

## 2. This eBook* may NOT be

a. Sold individually or as part of package.

b. Modified in any way.

c. Reversed-engineered.



*eBook refers to this PDF and any of its content including pages and images in either electronic or printed form.

माझं हे दुसरं पुस्तक

माझ्या कविमनातील

शीघ्रकाव्यात्मक विचार

दृष्टिक्षेत्रात आणणाऱ्या

या पुण्य धरती मातेला

अर्पण करतो.

धरताई, तुमचा आशीर्वाद सदाकाळ

माझ्या पाठीशी असू द्या.

# अनुक्रमणिका

# प्रस्तावना

**आपले मन हे असते चंचल**
**आवडते जे काही त्यांचेच करावे अंचल**
**राहत नसतात साऱ्याच अविस्मरणीय गोष्टी लक्षात**
**म्हणूनच 'शीघ्रकाव्य' करुनी ठेवूया साऱ्याच दृष्टिक्षेपात**

आपण किती घडामोडी अचूक सांगतो त्यापेक्षा त्या कशा व्यक्त करतो हे महत्वाचे असते. प्रत्येकासमोर खूप गोष्टी घडत असतात पण सर्वांचा विचार सारखा नसतो. काहीजणांना त्याक्षणी घडलेली घटना तुरळक, व्यर्थ, फुटकळ वाटते पण जेव्हा तीच गोष्ट शब्दरूपात उतरते तेव्हा ती नक्कीच एक लाख मोलाचे स्मित नकळतपणे निर्माण करत असते.

**शीघ्रकाव्य** हे असे माध्यम आहे की जिथे प्रसंग आणि घडामोडी कुणालाही न दुखावता कायम चांगल्या आणि अविस्मरणीय आठवणींना काव्याच्या स्वरूपात रेखाटून स्मृतिकोशात दडलेल्या त्या अनमोल क्षणांनाच उजाळा देते. अगदी असाच यशस्वी काव्यानुभव **हनुबाब** यांच्या या **शीघ्रकाव्य** नामक काव्यसंग्रहातून वाचक रसिकांना येतो.

कविमन हे सतत भिरभिरत असते आणि त्या भटकंतीमध्ये अनुभवलेली परिस्थिती ही सोप्या शब्दांमध्ये सर्वांसमोर प्रेषित करणे हाच एक सहज सोपा या कविमनाचा उद्देश आहे. अनावधानाने आपण कुणासाठी तरी आपल्या स्वतःला विसरून, हरपून जातो याचा प्रत्यय येतो तो असा –

**तुझ्यासाठी मी आईला विसरलो**
**तुझ्यासाठी मी बाबाला विसरलो**
**स्वतःच्या भावा-भहिणीला विसरलो**
**आणि आज तूच मला विसरलीस?**

आणि यामधून जर बाहेर यायचे असेल, तर **शीघ्रकाव्य** हे एक उत्तम माध्यम नक्कीच आहे; कारण याद्वारे वास्तवाचे भान होते आणि जीवनातील कटू सत्य देखील समोर मांडता येते, जे येथे कवीने अत्यंत मार्मिक शब्दांनी डोळ्यात जणू जळजळीत अंजन घालावे तसे अभिव्यक्त केले आहे. तसेच वेळ प्रसंगी दोस्ती काय असते आणि ती कशी निभावण्याची असते हे सुद्धा **शीघ्रकाव्या**तून मांडण्यात आले आहे ते असे -

**अशी ही आम्हा तिघांची जोडी**
**असताना सोबत हिला कोणी न मोडी**
**आहे आपली जोडी लय भारी**
**राहावी अशीच ही आपली यारी**

**- श्री. प्रवीण चावरे**
**कोल्हापूर**

# मनोगत

**शीघ्रकाव्य** म्हणजे मनात आलेले शीघ्रविचार कवितेच्या रूपात मांडून काव्य रचणे होय. गेली चार पाच वर्ष कोण जाणे नकळतच माझ्या कविमनातून अशा असंख्य काव्यरचना निर्माण होत आहेत. कुठला पण विचार, कसला पण विचार, काय पण असू द्या, मला त्याच्यात काव्य दिसून येतं. जेव्हा जेव्हा असा विचार डोक्यात येतो तेव्हा तेव्हा मी वेळ वाया न घालवता तो एका कागदावर अतिशीघ्र ओकून टाकतो. हा कागद म्हणजे 'tissue paper', कारण तोच माझ्या सान्निध्यात असायचा. आणि मी त्याक्षणी या कागदावर सहजच काव्यरचना करण्याचा प्रयत्न करायचो.

करता करता असे अनेक **शीघ्रकाव्ये** माझ्या हातून घडली आणि एक भला मोठा कागदांचा भारा माझ्या साहित्यग्रंथालयात जमला. त्याच्यातील काही निवडक कविता मी ह्या **शीघ्रकाव्यात** मांडल्या आहेत. ह्या कविता मी कधी आगगाडीत असताना लिहिल्या, कधी दुकानात, कधी हॉटेलात, तर कधी ऑफिसात, कधी टेकडीवर, तर कधी तळ्याकाठी. म्हणजेच, मी धरतीच्या कुठल्याही कोपऱ्यात असलो आणि जर माझ्याजवळ एक कागद वा टीशू पेपर असेल तर सहजच समोरच्या विषयावर माझ्या हातून कविता घडायच्या. म्हणूनच मी या धरती मातेचे, ‘माझ्या धराताईचे’ खूप आभार मानतो.

हे **शीघ्रकाव्य** घडवून आणणारा, तसेच मला प्रोत्साहन देणारा माझा मित्रपरिवार - श्री. नीलेश जोशी, प्रवीण चावरे, श्रीमती संध्या सिंग, बाब नरेश, सुधा, धीरेंद्र, रक्षा, रुद्र, कॅविन, अंशुमान, प्रियंका, नंदिनी, जयश्री, नाझ, निकिता,

दीपक, सौरभ, तन्वी, शशी, सायली, लता, प्राजक्ता, अजित, हेमंत, वैदेही, गुरु, सिल्वन, शिवोन, केतकी, प्रीतम, तसेच हिडिंबादेवी आणि ज्या ह्या शीघ्रकाव्याच्या निर्मितीचे मूळ स्रोत असलेल्या, वेळोवेळी माझ्या शीघ्रविचारात उतरलेल्या असंख्य व्यक्तिरेखा यांचे मी खूप आभार मानतो. माझ्या घरकुलातील माझी आई, भाऊ, दादा, भाई, भैय्या, वहिन्या, ताई, माई, मुलं आणि कुटुंबीय यांचा पण मी आभारी आहे, करण यांच्यातले काही माझे शीघ्रविषय बनले आहेत.

श्री. प्रवीण चावरे यांनी आपल्या कायमस्वरूपी अतिव्यस्त दिनक्रमातून वेळ काढून माझ्या या **शीघ्रकाव्या**ला तितक्याच शीघ्रतेने प्रस्तावना लिहून मला उपकृत केले त्याबद्दल मी त्यांचा ऋणी आहे. डॉ. नीलेश जोशी यांनी या संपूर्ण पुस्तकाचे प्रूफरीडिंग करून माझ्या उभरत्या मराठी भाषेला सुधारून तिला योग्य वळण दिल्याबद्दल मी त्यांचा मनापासून आभारी आहे.

तसेच या पुस्तकाचे मुखपृष्ठ बनवणाऱ्या श्री. संतोष दाभोळकर आणि श्री. राम धस यांचा मी आभारी आहे. M/s. eBook Publication Pvt. Ltd. यांनी या **शीघ्रकाव्याला** प्लॅटफॉर्म देऊन प्रकाशित केल्याबद्धल मी त्यांचापण आभारी आहे.

अपेक्षा आहे की हे माझ्या **कविमना**तील **शीघ्रकाव्य** आपल्याला जरूर आवडेल. तुमच्या प्रतिक्रिया नक्कीच कळवा.


**हनुबाब**

गोवा

९०४९०८३०२५

# हे ईश्वरा

तूच आहे तो, तूच तो
तूच आहे माझ्यात, मी आहे तुझ्यात

तूच आहे माझं जीवन घडविणारा
तूच आहे माझ्या जीवाला राबविणारा

तूच आहे माझ्या जीवनाचा शिल्पकार
तूच आहे माझ्या मनातला विश्वाकार

तूच आहे माझ्यात माणुसकी भरणारा
तूच आहे माझा अमाणूस बनवणारा

तूच आहे माझा प्राण, माझं जीवन
तूच आहे पूर्व, पश्चिम, उत्तर, दक्षिण

तूच आहे शक्ती, सरस्वती, लक्ष्मी, तूच माता
तूच आहे ब्रम्ह, विष्णू, महेश, तूच दाता

तूच आहे आत्मा, तूच परमात्मा
तूच माझ्यातला भाव, माझा गरिमा

तूच आहे ईश्वर, तूच परमेश्वर
तूच आहे आकार, तूच निराकार

तूच आहे कर्ता, तूच करविता
तूच आहे हर्ता, तूच दाता

तूच आहे वडील, तूच माझी माता
तूच आहे माझ्यातली माया, ममता

तूच आहे सर्वस्व, तूच आहे सर्वेश्वर
तूच आहे रे, तूच तो माझा ईश्वर

हे ईश्वरा, माझ्यातला मीपणा काढून टाक
जे काही वाईट केलं, त्याला माफ करून टाक

मला माझ्यातली माणुसकी जपू दे
सर्वांवर आदर आणि प्रेम असू दे

मी जे करतो त्यात मला सफलता दे
माझ्या या साफल्य कार्यामुळे
बहुतेकांना मदत होऊ दे

---

देवाला नमन करून मी हे शीघ्रकाव्य तुमच्या समोर मांडतो

## गणपती चालला आपल्या गावाला

गणपती चालला आपल्या गावाला
सोडून आम्हाला इथे एकट्याला
का गेलास असा मधेच उठून?
नाही पडत चैन मला इथे बसून

आला होतास तू पाच दिवसांसाठी
राहिलास मात्र तू तीन दिवसांसाठी
का असा गेलास लवकर उठून?
तीन दिवसात गेलास घर सोडून

तुझ्या या पाच दिवसांच्या आत
करणार होतो मी कुणाशी बात
नाही करू शकलो मी वाणी
राहिली माझी अधुरी कहाणी

आता राजा तू जातोस, खुशाल जा
पुढच्या वर्षी लवकर ये, समजलं ना
कारण खूप काही राहिलं करायचं
खूप काही राहिलं सांगायचं, बोलायचं

पुढच्या वर्षी येणार तू घरात
तोवर येणार माझी राणी घरात
दोघे मिळून सेवा तुझी करू
हे गणेशा, नमन तुला करू

गणपती बाप्पा मोरया
पुढच्या वर्षी लवकर या

|| जय गणेशाय नमः ||

---

गणपती येऊन लवकरच आपल्या गावाला परतला आणि एक अधुऱ्या कहाणीचं शीघ्रकाव्य निर्माण झालं.

# आम्ही तिघे

आम्ही तिघे, आहोत असे वेडे खुळे
एकसारखा विचार असूनही, असतो वेगळे
प्रयत्न खूप करूनही, आम्हास यश न मिळे
म्हणूनच वागत असतो, आम्ही जगा-वेगळे

फिरत असतो, बऱ्याचदा सोबत
काळजी घेत असतो, एकमेकांची सतत
एक असला दुसरा नसला, तर चैन न पडे
आम्हा तिघांची जोडी, अशी वेगळी न घडे

अशी ही आम्हा तिघांची जोडी
असताना सोबत, तिला कोणी न मोडी
आहे आपली जोडी लय भारी
अशीच राहावी ही आपली यारी

---

तीन मित्र एकदुसऱ्याच्या सानिध्यात बरेच प्रवास करायचे, त्यातील एक प्रवासात हे शीघ्रकाव्य घडले

# मी सावली

मी सावली
कुणाला मी दिसे
कुणाला न दिसे

अतिप्रकाशात दिसत नाही
अतिअंधारात तर नाहीच नाही

कमी उजेडात मी दिसते छान
कमी काळोखात नसते प्राण

बघेल तू मला जेव्हा जेव्हा
दिसेन मी तुला तेव्हा तेव्हा

पाठ तू मला जरी फिरवली
असणार मी तुझीच सावली

मी सावली
राहणार मी सोबत सतत
सुःख दुःखात असेन सोबत

जन्मापासून मरणापर्यंत
मरणानंतरच्या क्षणापर्यंत

---

एकदा ट्रेनच्या प्रवासात असताना ती सावली कवीशी हितगुज करताना

हे शीघ्रकाव्य रचले

# हे देवा, तू आहे की नाही

हे देवा, तू आहे की नाही
मला हेच समजत नाही
जो करी तुझी उपासना
त्यालाच मिळे ही वेदना

करतच आहे तुझी आठवण
देत नाही काहीच निवारण
करतच गेले तुझी साधना
ऐकत नाही त्यांची आराधना

दिवस कसे सारवत गेले
एक एक क्षण घसरत गेले
ज्यावेळी असावी तुझी बरसात
त्याचवेळी तू सोडलीस साथ

किती म्हणून करावी याचना
दिवस रात्र सोसावी वेदना
नाही का त्यांनी जगावं आरामात
हे देवा, आहे की नाही तू या जगात

आज ते सर्वपरीने परिपात्र असून
ते तेज, ती विद्वत्ता, ते चातुर्य असून
काहीच का रे पडत नाही त्यांच्या पदरात
वाढदिवसाला पण ते नाही राहू शकत घरात

हे देवा, दे ना त्यांना तुझा साक्षात्कार
कर ना आता एक असा चमत्कार
त्यांना एक स्थिर नोकरी, ऐश्वर्य दे
एक सुखी जीवन, कार्यकाळ दे

---

कवी एका मित्राबद्धल देवाकडे शीघ्रकाव्यात्मक तक्रार करताना

# ते फुल

सुंदर आहे ते फुल
सुंदर आहे ते पान
पिवळ्या नारंगी रंगाने
दिसत आहे अगदी छान

का म्हणून पाठवलेस मला
नाही समजत आहे मजला
पण आवडले ते खूप मला
नाही सांगू शकत मी हे कुणाला

कोण आहेस तू?
का ठेवले हे फुल तू?
काय आहे तुझ्या मनात?
लिहिलं का नाही तू पानात?

काय संदेश आहे त्या फुलात?
शिरत नाही माझ्या या दिमाखात
काय म्हणून सांगू इच्छितेस?
आहे का गं काय विशेष?

असं कधी माझ्या आयुष्यात नाही घडले
सुंदर फुल असे कोणीही मला नाही दिले
असे अनेक प्रश्न माझ्या मनात येतच राहिले
का आणि कशाला ते फुल मला तू दिले?

---

एके दिवशी कुणीतरी ते फूल कवीच्या टॅबलवर ठेवले आणि हे शीघ्रकाव्य घडले, तिच्या शोधात कवी अजून पर्यंत आहे

## तेजस्वी ते व्यक्तिमत्व तुमचे

तेजस्वी ते व्यक्तिमत्व तुमचे
ओजस्वी ते नेतृत्व तुमचे
दृढ तो इरादा तुमचा
स्थिर तो निश्चय तुमचा

तुमच्या मनाचे तुम्हीच मालिक
साध्या गुणांचे तुम्ही असे एक
केलात तुम्ही सगळ्यांना एक
सतत रहावे तुम्ही असेच नेक

सर्वांना तुम्ही एकत्र जोडले
नाही कुणाला तुम्ही तोडले
सर्वांकडे एकदम प्रेमाने वागले
नाही कुणाबद्धल वाईट ठेवले

प्रेमळ आहात तुम्ही, असेच रहा
दृढनिश्चयी आहात तुम्ही, असेच रहा
असेच सगळ्यांना आनंदी ठेवा
असेच सर्वांना प्रेम करत रहा

मनात काही नाही तुमच्या
नाही तुम्हाला कसलीच अपेक्षा
नसून तुम्हाला काही आकांक्षा
देव घेत आहे तुमची परीक्षा

मला विश्वास आहे
तुम्ही जरूर घडणार
तुमच्या बरोबर
दुसऱ्यांना पण घडवणार

---

आपला मित्र नीलेश यांच्या वाढदिवसाची भेट म्हणून कवीने ही शीघ्रकविता लिहिली

## विसराळू मी गं विसराळू मी

विसराळू मी गं विसराळू मी
काय सांगू बाई, आहे गं विसराळू मी
आजच नाही असं, रोजच असतं असं
घडतं हे माझ्याच आयुष्यात, सांगू मी कसं

आज मी हे विसरते
उद्या मी ते विसरते
मला हे समजत नाही
का असते मला घाई

कधी विसरते मी चष्म्याला
तर कधी विसरते मोबाईलला
जर असच राहिलं चालायला
तर विसरणार मी माझ्याच नवऱ्याला

विसरण्याची सवय माझी, आहे जुनी-पुराणी
माझ्या नावाबरोबर जोडली, मीच ही निशाणी
नाव जरी असेल सुधा भिंगारदिवे जाणून
ओळखतात मला सगळी सुधा विसरदिवे म्हणून

अशी आहे मी एक वेडी खुळी
विसरत असते मी सगळ्याच वेळी
पण आहे मी एकदम साधी भोळी
म्हणतात मला सगळेच विसरभोळी

---

विसरभोळी मैत्रिण सुधाला कवीने ही एक शीघ्रकविता मस्करी म्हणून लिहिली

# काल होता तुझा वाढदिवस

काल होता तुझा वाढदिवस
मग का नाही सांगितलंस?
मनवणार होतो आम्ही हमखास
म्हणून बोलावलं नाही का आम्हास?

तू पण माझी मैत्रीण आहेस
मग सांगितलं का नाहीस?
करणार होतो गं साजरा
वाढदिवस तुझा हा बरा

असू द्या, आता झालं ते झालं
आणि मी तुला माफ केलं
खरं तर, तूच मला माफ कर
कारण, माहीतच नव्हतं मला तर

वाढदिवसाच्या तुझ्या तुला शुभेच्छा
पुऱ्या होऊ द्या तुझ्या सगळ्या इच्छा
तुला उदंड यश अन् आयुष्य लाभू दे
परमेश्वराची कृपादृष्टी सतत असू दे

# नीलू

नीलू म्हणजे नीलाक्षी
नीलू म्हणजे नीलेशही
नीलूची आई नीलिमा नि
नीलूचे बाबा निशिकांत

सगळे कशे एकमेकांचे
सगळे कशे एकमेकांसाठी
सगळे कशे एकमेकांना सांभाळतात
सगळे कशे एकमेकांबद्दल चिंतितात

नीलू ही सगळ्यांची लाडकी
नीलू ही सगळ्यांची आवडती
नीलू ही घरातील लहान
नीलू ही घराची शान

सगळ्यांची ती काळजी घेणारी
सगळ्यांची ती व्यवस्था बघणारी
सगळ्यांना ती सांभाळणारी
सगळ्यांवर ती प्रेम करणारी

ती लहान असून आहे तिला आयुष्याचे भान
तिला घरातील सगळ्या माणसांची आहे जाण
ती घर नि घरासाठी घेते बराच ताण
म्हणूनच घरच्यांना आहे तिचा अभिमान

---

नीलू म्हणजे नीलाक्षी हिला तिच्या वाढदिवसानिमित्त लिहिलेही ही शीघ्रकविता

# प्राणवी आज तू मला परत भेटलीस

प्राणवी आज तू मला परत भेटलीस
मनातील प्रेमज्वाला पुन्हा जागवलीस
हात तुझा तो हातात मिळवलास
काळजाला खूपच आनंद दिलास

नवीन वर्षाचा होता तो क्षण
येत होती तुझीच आठवण
भेटण्यासाठी केली होती मी प्रतीक्षा
मला भेटून तू पुरवलीस ती अपेक्षा

तुला भेटण्याची इच्छा ठेवली, नि तू भेटलीस
तुला बघण्याचा विचार केला, नि तू दिसलीस
प्राणवी तू मला भेटलीस, नि खरंच बरं वाटलं
कारण विचार जसा केला होता तसंच घडलं

---

प्राणवीला खूप दिवसानंतर भेटल्यावर कविमनातून हे शीघ्रकाव्य निर्माण झाले

# तुझ्यासाठी मी आईला विसरलो

तुझ्यासाठी मी आईला विसरलो
तुझ्यासाठी मी बाबाला विसरलो
स्वतःच्या भावा-बहिणीला विसरलो
आणि आज तूच मला विसरलीस?

आईने दिलेलं प्रेम विसरलो
बाबानी केलेली माया विसरलो
घरच्यांच्या प्रेमाची ऊब विसरलो
आणि आज तू माझं प्रेम विसरलीस?

आजपर्यंत मी तुझ्याच मागे गेलो
तुझ्यामुळे मित्रांपासून दुरावलो गेलो
तुझ्यासाठी नातेवाईकांकडून ठुकरावलो
आणि आज तूच मला ठुकरावलेस?

आज तू गेलीस, रमली तुझ्या आयुष्यात
नाही परत आलीस, कधीच पुन्हा आयुष्यात
आणि त्याच क्षणी मी परतलो, माझ्या आयुष्यात
आई बाबा भाऊ बहीण सगळेच, परतले आयुष्यात

एकदा एका हॉटेलमध्ये जेवताना एक दृश्य कविमनासमोर आले आणि हे शीघ्रकाव्य तयार झाले

# चला मन प्रसन्न ठेऊया

चला मन प्रसन्न ठेवूया
चिंता सगळी सोडून देऊया
वाईट सगळं विसरून जाऊया
बरं सगळं साठवून ठेऊया

मन खुश ठेऊया
मनात प्रेम जागवूया
जीवन आनंदमय बनवूया
सगळ्यांना आनंदाने बहरवूया

चला मन प्रसन्न ठेऊया
चला मन प्रसन्न ठेऊया

---

सगळं काही चालूच असणार, बरं-वाईट होतच राहणार; आपल्याला मात्र मन प्रसन्न ठेव्याचय. म्हणूनच शीघ्रकवी म्हणतो - चला मन प्रसन्न ठेऊया

**आपले मन हे असते चंचल**
**आवडते जे काही त्यांचेच करावे अंचल**
**राहत नसतात साऱ्याच अविस्मरणीय गोष्टी लक्षात**
**म्हणूनच ‘शीघ्रकाव्य’ करुनी ठेवूया साऱ्याच दृष्टिक्षेपात**

आपण किती घडामोडी अचूक सांगतो त्यापेक्षा त्या कशा व्यक्त करतो हे महत्वाचे असते. प्रत्येकासमोर खूप गोष्टी घडत असतात पण सर्वांचा विचार सारखा नसतो. काहीजणांना त्याक्षणी घडलेली घटना तुरळक, व्यर्थ, फुटकळ वाटते पण जेव्हा तीच गोष्ट शब्दरूपात उतरते तेव्हा ती नक्कीच एक लाख मोलाचे  स्मित नकळतपणे निर्माण करत असते.

**शीघ्रकाव्य** हे असे माध्यम आहे की जिथे प्रसंग आणि घडामोडी कुणालाही न दुखावता कायम चांगल्या आणि अविस्मरणीय आठवणींना काव्याच्या स्वरूपात रेखाटून त्या स्मृतिकोशात दडलेल्या त्या अनमोल क्षणांनाच उजाळा देते. अगदी असाच यशस्वी काव्यानुभव **हनुबाब** यांच्या या **शीघ्रकाव्य** नामक काव्य संग्रहातून वाचक रसिकांना येतो.

- प्रवीण चावरे




॥ग्रन्थ एव गुरुः॥
eBook Publication Pvt. Ltd.®